**महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, म. रा., मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्रशासन**
**गृहविभाग**
**शासन निर्णय क्र.एमटीएस-०३२२/ प्र.क्र. ३२०/ पोल-४**
दुसरा मजला,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ०७ मार्च, २०२४.

**वाचा:-** १) गृहविभाग, शासन निर्णय क्र. एमटीएस-०३२२/ प्र.क्र.३२०/ पोल-४,दि. २१.०९.२०२३
२) सहायक पोलीस महासंचालक (नि.व स.),पोलीस महासंचालक कार्यालय,म.रा.,मुंबई यांचे क्र.पोमसं/२६-ब/ॲकब्यु/ वा.चा. पदे/मुदतवाढ/०६/२०१५, दि.२७.०२.२०२४ चे पत्र.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२३.
४) वित्त विभाग,शासन शुध्दिपत्रक क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.६.०९.२०२३.
५) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

**शासन निर्णय :-**

महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, म.रा.,मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० वाहन चालक अस्थायी पदांना संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यत वित्त विभागाने दिलेल्या अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात आलेली आहे. उपरोक्त नमूद संदर्भ क्र. ५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार मंत्रालयीन प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहे.उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये, महासंचालक,ॲन्टी करप्शन ब्युरो, म. रा., मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ पासून पुढील मुदतवाढ देणेबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने या शासन निर्णया सोबतच्या सहपत्रात नमुद केलेल्या महासंचालक,ॲन्टी करप्शन ब्युरो, म. रा., मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० वाहन चालक अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत खालील अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व अस्थायी पदे ज्या कारणासाठी, अटी व शर्तीचे अधीन राहून मंजूर केली आहेत त्यांचे पालन करण्यात आले आहे.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ नुसार विहित केलेल्या अटीचे व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात येईल व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

३) दरम्यानच्या काळात आपल्या कार्यालयाच्या अस्थापनेवरील मंजूर पदांच्या आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चिती करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. **त्यानुसार यापुढे अस्थायी पदांना सुधारीत आकृतीबंधात समावेश करण्याबाबतची कार्यवाही सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने करावयाची आहे. तसेच, अस्थायी पदांची मुदतवाढ ही शेवटची समजण्यात यावी,** यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. त्यानुसार सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरीत कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधितांना द्याव्यात. सुधारीत आकृतीबंध निश्चित

झाला नसल्याने अस्थायी पदांना यापुढे मुदतवाढ न मिळाल्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यांचा प्रश्न निर्माण झाल्यास ती जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांची राहील.

२. सदर प्रकरणी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक : बी-१ लेखाशिर्ष "२०५५-पोलीस- १०१ (३) ॲन्टी करप्शन ब्युरो" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क.,दि.२१.०२.२०२४ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१२४३०११०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f44 2b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF8 0F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2024.03.07 12:52:26 +05'30'

**( सुधाकर यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. महासंचालक,ॲन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई-१.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-७/ वित्तीय सुधारणा-१),मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासनअधिकारी (पोल-३),गृहविभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती/ गृह विभाग, पोल-४.

**महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील २० अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीएलएफ-०३२२/प्र.क्र. ३२०/पोल-४, दि. ०७.०३.२०२४ सोबतचे विवरणपत्र

| अ. क्र. | पदनाम | पद संख्या | पद निर्मितीचा शासन निर्णय | अस्थायी पदांना मुदतवाढ मिळाल्याचा यापुर्वीचा शासन निर्णय |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस शिपाई वाहन चालक | ८ | क्र.एमटीएस-१०९२/४३०/(२९)/पोल-४, दि.०८.०७.१९९३ | शा.नि.क्र.पीएलएफ-०३२२/ प्र.क्र.३२०/ पोल-४, दि. २१.०९.२०२३ |
| २ | पोलीस शिपाई वाहन चालक | ६ | क्र.एमटीएस-१०९३/२४००/(२५)/पोल-४, दि.१२.०९.१९९५ | |
| ३ | पोलीस शिपाई वाहन चालक | ६ | क्र.एमटीएस-१०९६/२७२३/न.बा.२८/पोल-४, दि.०१.०८.१९९७ | |
| | **एकूण** | **२०** | | |